महिला अत्याचार प्रतिबंध कक्षाचा कार्यभार विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क सुरक्षा, मुंबई यांच्याकडे कायमस्वरुपी सोपविण्याबाबत

---

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : आयपीएस-२११७/प्र.क्र.१०६/पोल-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख : ०३ जूलै, २०१७

वाचा- : शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण-२०१५/प्र.क्र.११९/विशा-३अ, दि. ०५.०१.२०१६

**प्रस्तावना-**

राज्यातील महिलांवर होणाऱ्या अत्याचारांना प्रतिबंध करण्यासाठी तसेच बाल वेश्या प्रतिबंधक कायदा व अनैतिक व्यवसाय प्रतिबंधक कायद्याची परिणामकारक अंमलबजावणी करण्यासाठी राज्य स्तरावर पोलीस उपमहानिरक्षक यांचे नियंत्रणाखाली महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष निर्माण करण्यात आला आहे. उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये पोलीस उपमहानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंध विभाग या पदाची श्रेणीवाढ करुन या पदाचे पदनाम विशेष पोलीस महानिरीक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध व सायबर गुन्हे) असे करण्यात आले आहे व महिला अत्याचार प्रतिबंध विभागाचे पुणे येथील कार्यालय तेथील मंजूर पदांसह मुंबई येथे स्थलांतरीत करण्यात आले आहे.

महिला अत्याचार हा विषय अत्यंत संवेदनशील असून राज्यात विविध ठिकाणी महिला अत्याचारासंदर्भात घडलेल्या घटनांच्या अनुषंगाने तसेच मा. उच्च न्यायालयात सुरु असलेल्या विविध जनहित याचिका व त्यास अनुसरुन मा. न्यायालयात वेळोवेळी दाखल करावयाची प्रतिज्ञापत्रे, या संदर्भात मा. न्यायालयाने दिलेले निर्देश व त्यानुसार करावयाची कार्यवाही, महिला अत्याचाराबाबत विविध स्वयंसेवी संस्था व वैयक्तिक रित्या दाद मागण्यासाठी करण्यात आलेली निवेदने व तक्रार अर्ज यांचा वेळीच निपटारा होण्याच्या दृष्टीने महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष, विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क सुरक्षा (Protection Of Civil Rights), यांचेशी संलग्न ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>-**

महिला अत्याचार प्रतिबंध कक्षाच्या कामकाजामध्ये व विविध पोलीस आयुक्तालये, जिल्हा स्तरावरील पोलीस अधीक्षक कार्यालये यांच्यात समन्वय येण्याकरीता सदर कक्ष पोलीस महासंचालकांच्या अधिपत्याखाली राहणे गरजेचे ठरते. ही बाब विचारात घेऊन शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, महिला अत्याचार प्रतिबंध कक्षाचा कार्यभार हा पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई यांच्या अधिपत्याखालील विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क सुरक्षा (Protection Of Civil Rights), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे या शासन निर्णयान्वये कायमस्वरुपी सोपविण्यात येत आहे व त्याचे पदनाम विशेष पोलीस महानिरीक्षक, (नागरी हक्क सुरक्षा व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष) असे करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७०३१७३६५८०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Vasantrao Mahajan

Digitally signed by Tushar Vasantrao Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, cn=Tushar Vasantrao Mahajan
Date: 2017.07.03 17:45:30 +05'30'

**( तुषार महाजन )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. अ.मु.स.(गृह) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई
९. विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क सुरक्षा, मुंबई
१०.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) -१, महाराष्ट्र, मुंबई.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवड नस्ती, पोल-१